पुणे शहरातील शिवाजीनगर पोलीस वसाहत येथे ८४० नवीन सेवा निवासस्थाने बांधण्याच्या प्रकल्पातील प्रकार-२ च्या सेवा निवासस्थानांच्या आठ इमारतींपैकी दोन इमारतींचे संपूर्ण बांधकाम मे. रमा-पुरुषोत्तम फाऊंडेशन, पुणे, यांनी स्वत:च्या खर्चाने करण्यास मान्यता देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन

गृह विभाग

शासन निर्णय क्र. संकीर्ण-१०१८/प्र.क्र.३८३/पोल-७.

मंत्रालय, दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२.

दिनांक २८ फेब्रुवारी २०२०.

वाचा :-

१) पोलीस महासंचालक, म.रा., यांच्या कार्यालयाचे पत्र क्र. पोमसं/ २७-ब/ २८-ब-२/ शिवाजीनगर-बै.चा.निवा.इमा.बांध./ पुणे-शहर/ २९९/ २०१३, दिनांक १४.१२.२०१८, २२.०२.२०१९, ०५.०७.२०१९, २५.०७.२०१९ व २६.०८.२०१९.

२) शा.नि., गृह विभाग, क्र. संकीर्ण-१०१८/ प्र.क्र.३८३/ पोल-७, दिनांक ०२.०१.२०१९.

प्रस्तावना.

पुणे शहरातील शिवाजीनगर पोलीस वसाहतीतील बैठ्या चाळी पाडून त्या ठिकाणी प्रकार-२ ची ६७२ (आठ इमारती), प्रकार-३ ची ८४ (एक इमारत) व प्रकार-४ ची ८४ (एक इमारत) असे एकूण ८४० नवीन सेवा निवासस्थाने *(१० इमारती अधिक "Amenities Block")* यांचे बांधकाम करण्याचा प्रकल्प हा म.रा. पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ मर्या. यांच्याकडून हाती घेण्यात आला आहे. या प्रकल्पाला पुणे महानगरपालिका, पुणे, यांच्याकडून दिनांक २७.०९.२०१७ रोजी बांधकाम परवानगी प्राप्त झाली आहे.

२. मे. रमा-पुरुषोत्तम फाऊंडेशन, पुणे, यांनी, एक सामाजिक जबाबदारी म्हणून, या प्रकल्पातील पोलीस शिपाईदलासाठी बांधावयाची एक इमारत संपूर्ण आणि आणखी एक इमारत जोत्यापर्यंत *(plinth level)* स्वत:च्या खर्चाने बांधून देण्याबाबतचा प्रस्ताव स्वेच्छेने पोलीस आयुक्त, पुणे शहर, यांच्याकडे सादर केला होता. पोलीस आयुक्त, पुणे शहर, यांनी उक्त प्रस्ताव पोलीस महासंचालक, म.रा., यांच्यामार्फत शासनास सादर केला होता. त्या प्रमाणे उक्त प्रकल्पातील प्रकार-२ च्या सेवा निवासस्थानांच्या आठ इमारतींपैकी एक इमारत संपूर्ण आणि आणखी एक इमारत जोत्यापर्यंत *(plinth level)* यांचे बांधकाम मे. रमा-पुरुषोत्तम फाऊंडेशन, पुणे, यांनी स्वत:च्या खर्चाने करण्यास, विवक्षित अटींवर, शा.नि., गृह विभाग, क्र. संकीर्ण-१०१८/ प्र.क्र.३८३/ पोल-७, दिनांक ०२.०१.२०१९, द्वारे, मान्यता प्रदान करण्यात आली होती.

३. उक्त शासन निर्णयानुसार पोलीस आयुक्त, पुणे शहर, यांनी पोलीस महासंचालक, म.रा., यांच्यामार्फत प्रारुप करारनामा शासन मान्यतेसाठी सादर केला आहे. त्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

४. या दरम्यान, मे. रमा-पुरुषोत्तम फाऊंडेशन, पुणे, यांनी पोलीस महासंचालक, म.रा., यांच्या कार्यालयाने उक्त प्रकल्पातील प्रकार-२ च्या सेवा निवासस्थानांच्या आठ इमारतींपैकी दोन इमारतींचे संपूर्ण बांधकाम, बांधकाम परवानग्यांसाठी येणारा खर्च वगळून, स्वतःच्या खर्चाने करण्याबाबतचा प्रस्ताव पोलीस आयुक्त, पुणे शहर, यांना सादर केला. त्याप्रमाणे या सुधारित प्रस्तावास मान्यता देण्याची विनंती पोलीस आयुक्त, पुणे शहर, यांनी पोलीस महासंचालक, म.रा., यांच्यामार्फत शासनास केली आहे.

५. त्या अनुसार शासनाने पुढील निर्णय घेतला आहे.

शासन निर्णय.

पुणे शहरातील शिवाजीनगर पोलीस वसाहतीतील बैठ्या चाळी पाडून त्या ठिकाणी ८४० नवीन पोलीस सेवा निवासस्थाने बांधण्याच्या प्रकल्पातील प्रकार-२ च्या सेवा निवासस्थानांच्या आठ इमारतींपैकी दोन इमारतींचे संपूर्ण बांधकाम, बांधकाम परवानग्यांसाठी येणारा खर्च वगळून, मे. रमा-पुरुषोत्तम फाऊंडेशन, पुणे, यांनी स्वतःच्या खर्चाने करण्यास, पुढील अटींवर, याद्वारे, मान्यता देण्यात येत आहे:-

अटी.-

१) मे. रमा-पुरुषोत्तम फाऊंडेशन यांनी उक्त बांधकाम हे स्वतःच्या खर्चाने करावे. त्याकरिता शासनाकडून निधी किंवा साधने देण्यात येणार नाही.

२) मे. रमा-पुरुषोत्तम फाऊंडेशन यांनी उक्त बांधकाम हे म.रा. पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ मर्या. यांच्या नकाशानुसार करावे.

३) मे. रमा-पुरुषोत्तम फाऊंडेशन यांनी उक्त बांधकामासाठी म.रा. पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ मर्या. विहित करतील त्या मानकाचे साहित्य व सामान वापरावे.

४) मे. रमा-पुरुषोत्तम फाऊंडेशन यांनी उक्त बांधकाम पूर्ण करुन दोन्ही इमारती एप्रिल २०२१ च्या अखेरपर्यंत पोलीस आयुक्त, पुणे शहर, यांना ताब्यात द्याव्या.

५) म.रा. पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ मर्या. हे उक्त बांधकामावर देखरेख ठेवतील व त्यांना कामाच्या निरीक्षणाचे अधिकार राहतील.

६) उक्त बांधकाम करण्याच्या प्रयोजनासाठी तात्पुरत्या वापरासाठी मे. रमा-पुरुषोत्तम फाऊंडेशन यांना जी जागा लागेल ती पोलीस आयुक्त, पुणे शहर, यांनी सीमांकित करावी व तिचा तात्पुरता ताबा द्यावा.

(७) उक्त बांधकाम किंवा बांधण्यात आलेल्या इमारती किंवा उक्त इमारती जेथे बांधण्यात येणार आहेत ती जमीन यांच्यावर मे. रमा-पुरुषोत्तम फाऊंडेशन यांचा कोणताही अधिकार असणार नाही.

(८) उक्त बांधकाम करण्याच्या ऐवजात मे. रमा-पुरुषोत्तम फाऊंडेशन यांना शासनाकडून कोणतीही सोय, सवलत किंवा लाभ देय असणार नाही.

२. उक्त प्रयोजनासाठी मे. रमा-पुरुषोत्तम फाऊंडेशन, पुणे, यांच्याशी करार करण्यास पोलीस आयुक्त, पुणे शहर, यांना, याद्वारे, प्राधिकृत करण्यात येत आहे. पोलीस आयुक्त, पुणे शहर, यांनी करारनाम्याचा सुधारित मसुदा शासनाच्या मान्यतेसाठी तात्काळ, पोलीस महासंचालक, म.रा., यांच्यामार्फत, सादर करावा.

३. शासन निर्णय, गृह विभाग, क्र.संकीर्ण-१०१८/ प्र.क्र.३८३/ पोल-७, दिनांक ०२.०१.२०१९, याद्वारे, अधिक्रमित करण्यात येत आहे.

४. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या *www.maharashtra.gov.in* या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००२२८१२५५२३६५२९ असा आहे. हा शासन निर्णय डीजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SWAPNIL GOPAL BORSE

Digitally signed by SWAPNIL GOPAL BORSE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=c6a6e7cad855fc787a96e36f11fbc87a9f66cfd9bad01184493f2735ad885627, postalCode=400032, street=2ND FLOOR,MANTRALAYA,MADAME CAMA MARG,MUMBAI, serialNumber=8538cd1e408948f7d025537d5f6589bd8958d1b95322e66d2cc5edf89ad0d79e, ou=HOME DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=SWAPNIL GOPAL BORSE
Date: 2020.02.28 12:58:27 +05'30'

(स्वप्नील गोपाल बोरसे)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राज भवन, मलबार हिल, मुंबई.
२) मा. मुख्य मंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. उप मुख्य मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. गृह मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा/ विधानपरिषद, यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई.
६) मा. राज्यमंत्री, गृह (शहरे), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७) मा. राज्यमंत्री, गृह (ग्रामीण), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
८) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
९) पोलीस आयुक्त, पुणे शहर.
१०) मे. रमा-पुरुषोत्तम फाऊंडेशन, पुणे (पोलीस आयुक्त, पुणे शहर, यांच्यामार्फत)

प्रत-

१) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ मर्यादित, मुंबई.
२) निवड फाईल, पोल-७.